होतं आणि खऱ्या अर्थाने लॉग इन होतं. म्हणजे 'लॉग आऊट'ची कथा सुरू होते. कादंबरीतील एका संवादी, एकमेकांना समजून घेणाऱ्या, एकमेकांवर प्रेम करणाऱ्या चौकोनी कुटुंबाची ओळख होते. जान्हवी अशा कुटुंबात वाढणारी. तिचे आई, बाबा आणि भाऊ जयेश आपल्याला भावतात ते त्यांच्या एकमेकांना समजून घेण्यामुळे. यातही अधूनमधून कादंबरीत अगदी किंचित डोकावणारा जान्हवीचा जयेशदादा अधिक भाव खाऊन जातो. जान्हवीला समजून सांगण्याची त्याची पद्धत त्याची प्रगल्भता सूचित करते. जान्हवी जेव्हा तिच्या मनातली घालमेल त्याच्यासमोर बोलते तेव्हा तो तिला 'नको क्षुद्र शृंगार तो दुर्बलांचा, तुझी दूरता त्याहुनि साहवे' ही कुसुमाग्रजांची कविता (पृथ्वीचे प्रेमगीत) ऐकवतो आणि तिला काय निर्णय घ्यायला पाहिजे हे सूचित करतो.

एकतर्फी प्रेमातून खून झाल्याची बातमी ऐकून जान्हवीची आई अस्वस्थ होते. 'अगं, तू खूप साधी आणि सरळमार्गी आहेस. तू लगेच विश्वास ठेवतेस एखाद्या अनोळखी व्यक्तीवर...' अशी एका आईच्या मनातील काळजी वाचताना नकळत मालतीबाई बेडेकरांच्या 'मनस्विनीचे चिंतन' या पुस्तकाची आठवण होते. मात्र, कादंबरी जशी पुढे सरकत जाते तशी ही चिंता कमी होते. याला कारण काही वर्षांपूर्वी 'मनस्विनीचे चिंतन'मध्ये मालतीबाईंनी आपल्या मुलांना वाढवताना जे चिंतन केलं त्यातून व्यक्त होणारी चिंता एका आईची होती. ती आताच्या आईच्या मनातही आहे. मात्र, 'लॉग आऊट'मधील जान्हवीचा प्रवास पाहिला की ती चिंता काही अंशी तरी दूर होते. त्याला कारण दहावीत शिकणारी जान्हवी ज्या सजगतेने आपल्या भोवतालाकडे पाहते, त्यावरून ती आपल्या चांगल्या-वाईटाविषयी विचारपूर्वक निर्णय घेणारी आहे, तारुण्यसुलभ भावना उचंबळून आल्या तरी योग्य वेळी सावध होणारी आहे. मन आणि बुद्धीच्या संघर्षात समन्वय साधून पुढे वाटचाल करणाऱ्या जान्हवीची ही कथा तशी सरळ आणि साधी आहे.

एकमेकांचा आदर करत जगणाऱ्या मोकळ्या-ढाकळ्या कुटुंबातील जान्हवी आपल्या शाळेतल्या मित्रमैत्रिणींमध्ये रमणारी, कौटुंबिक प्रेमाची भुकेली मालविका नावाच्या मैत्रिणीला धीर देणारी. सई, मिताली, सुनीता या मैत्रिणींशी सतत संवाद साधणारी जान्हवी आपल्या कुटुंबातील घुसमट सांगणाऱ्या आयुषविषयी विचार करायला लागते. तिच्या कविता त्याने वाचलेल्या तिला आवडतं. त्याच्याबरोबर फोनवर बोलायला आवडतं. मेसेज, फेसबुक या आधुनिक माध्यमांतून एकमेकांचा संवाद सुरू होतो, जो दोघांनाही हवाहवासा वाटतो. तिला त्याचं आकर्षण वाटायला लागतं. मात्र, हे सगळं होताना जान्हवी सतत सावध वाटते. आयुषविषयी आपल्याला आकर्षण वाटतंय ते का, ते चांगलं की वाईट, याचा विचार करत वाटचाल करणारी जान्हवी सत्र परीक्षेत कमी मार्क पडल्याची कारणं शोधते तेव्हा अस्वस्थ होते. आपल्या सुनीता नावाच्या मैत्रिणीच्या बहिणीचा-सुरेखाचा प्रेमविवाहानंतरचा प्रवास बघते. आयुषनेच जिया शेख नावाचा फेक फेसबुक अकाउंट उघडून आपल्याला भावनिक बनवलं, हे कळल्यावर ती अधिक अंतर्मुख होते. शेवटी आयुषही अशाच फेक अकाउंटसारखा आपल्या आयुष्यात आला नसेल कशावरून, असं वाटण्याइतकं तिचं आयुषविषयीचं आकर्षण कमी होतं. एवढंच 'लॉग आऊट' कादंबरीचं कथानक. मात्र, हे घडत असतानाच या कादंबरीत अनेक बारीकसारीक तपशील येतात. कथानकाची गरज म्हणून हे तपशील येतात, पण ते कादंबरीला आशयसंपन्न बनवतात. जान्हवी आपल्या तारुण्यसुलभ भावनांच्या विश्वात जगताना या घटनांकडे ज्या संवेदनशीलतेने बघते त्यातून तिचं सामाजिक भान तर व्यक्त होतंच पण तिची प्रगल्भताही अधोरेखित होते. लेखिकेने कादंबरीत आपल्या विचारी कुटुंबाची व्यवस्था करून ठेवलेली आहे. त्यामुळे तिचं ते वागणं-बोलणं स्वाभाविक वाटतं.

जान्हवीचा मित्रांबरोबरचा संवाद जसा महत्त्वाच्या आहे तसंच वर्गातील शिक्षकांविषयीचं तिचं निरीक्षणही महत्त्वाचं आहे. तळवलकर मॅडमने नकळत अगर जाणीवपूर्वक केलेला जातीचा उल्लेख जसा तिला खटकतो, तसाच सायन्समधील शरीरशास्त्रावरचा धडा तुमचा तुम्ही करा, असं जेव्हा शिक्षक सांगतात तेव्हा शिक्षकांची मानसिकता आणि एकूण शिक्षणव्यवस्थेकडे पाहण्याचा दृष्टिकोनही लेखिका जान्हवीच्या आणि तिच्या आईच्या संवादातून सूचित करते... अशा अनेक घटना आणि प्रसंगांतून जान्हवीचं विचारी मन आपल्यासमोर येतं. पण हे सर्व वाचताना जान्हवी तिचं स्वाभाविक वय विसरली आहे असंही जाणवत नाही. तारुण्यसुलभ भावना तिच्या मनातही आहेत. म्हणूनच तर तिला आयुषचं आकर्षण वाटतं. आपल्या सौंदर्याविषयीची जागरुकता तिच्यात आहे. त्यातूनच चेहऱ्यावरच्या पिंपलकडे ती सारखी बघत राहते. या पिंपलमुळे आयुषला आपण आवडणार नाही ही भावना तिच्या मनात येते, ती स्वाभाविक वाटते. सुंदर दिसावं म्हणूनच ती डोळ्यांत काजळ घालते. आयुष्य हृदयाच्या आकाराचं खोडरबर चिकटवलेली पेन्सिल तिला देतो, तेव्हा ती परत घेताना खोडरबर तिच्याकडेच राहील याची खबरदारी घेतो याचं जान्हवीलाही मनातून बरं वाटतं...असे प्रसंग तिच्या मनातील घालमेल व्यक्त करणारे असले तरी कादंबरीभर नायिका एक विचारी मुलगी म्हणूनच आपल्या समोर उभी राहते, आणि तीच अधिक भावते.

◆ बबन मिंडे
भ्रमणध्वनी : ९८५०६९८१०२



अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषदेचे

# २३ वे विभागीय मराठी साहित्य संमेलन, दापोली

दिनांक : १९, २० डिसेंबर २०१४

## क्षणचित्रे



संमेलनाच्या ग्रंथदिंडीस प्रारंभ करताना मसापच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य. सोबत डावीकडून निमंत्रक पद्माकर कुलकर्णी, जिल्हा प्रतिनिधी वृषाली आफळे, कोषाध्यक्ष सुनील महाजन, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे व इतर मान्यवर.



संमेलनाच्या ग्रंथदिंडीत सहभागी झालेले अभिनेते सुबोध भावे, प्रकाश पायगुडे, सुनील महाजन, मसापच्या दापोली शाखेचे पदाधिकारी व कार्यकर्ते.



संमेलनाच्या अध्यक्ष ज्येष्ठ कवयित्री डॉ. अरूणा ढेरे आपले विचार मांडताना. सोबत व्यासपीठावर डावीकडून कोकण जिल्हा प्रतिनिधी प्रतिभा लिमये, प्रकाश पायगुडे, डॉ. माधवी वैद्य, सुनील महाजन, पद्माकर कुलकर्णी व इतर मान्यवर.




ज्येष्ठ अभिनेते राहूल सोलापूरकर यांची प्रकट मुलाखत घेताना कवी सौमित्र व प्रकाश पायगुडे.

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

| | | |
|---|---|---|
| खंड १ ला : | | रु. ५००/- |
| खंड २ रा : | भाग १ : | रु. ७००/- व |
| | भाग २ : | रु. ७००/- |
| खंड ३ रा : | | रु. ३५०/- |
| खंड ४ था : | | रु. ४००/- |
| खंड ५ वा : | भाग १ : | रु. ३५०/- व |
| | भाग २ : | रु. ३५०/- |
| खंड ६ वा : | भाग १ : | रु. ३५०/- व |
| | भाग २ : | रु. ३००/- |
| खंड ७ वा : | भाग १ : | रु. ७००/-, |
| | भाग २ : | रु. ८००/-, |
| | भाग ३ : | रु. ७००/- व |
| | भाग ४ : | रु. ७००/- |

**एकूण रु. ७०००/-**

**शाळा, महाविद्यालये आणि व्यक्तिगत ग्राहकांनाही रु. ५२५०/-**

डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस.टी. पार्सलने पाठवू. (वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट. व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपालखर्च वेगळा.)

मागणीसाठी संपर्क :

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०. दूरभाष : ०२०- २४४७५९६३

५०

बुक

प्रेषक





